**सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर उल्हासनगर महानगरपालिकेच्या C Block Chowk to Katkeshwar Mandir व C Block Chowk to UMC या रस्ते विकास प्रकल्पासाठी राज्य शासनाच्या पहिल्या हप्त्याचे अनुदान वितरण.**

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः नगरो-२०१४/प्र.क्र. २०२/नवि-३३

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक- २३ जानेवारी, २०१५.

**वाचा -**

1) **नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र. नगरो-२०१४/प्र.क्र.११९/नवि-३३,दि. २१/०८/२०१४.**
2) **नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र. नगरो-२०१४/प्र.क्र.१९४(४)/नवि-३३, दि. ०६ सप्टेंबर, २०१४.**

**प्रस्तावना -**

राज्यातील वाढते नागरीकरण लक्षात घेऊन नागरी भागांचा दिर्घकालीन व सुनियोजित विकास करण्याच्या दृष्टीने संदर्भाधीन क्रमांक ०१ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियान राज्यात राबविण्यात आहे.

०२. संदर्भाधीन क्रमांक ०१ येथील शासन निर्णयान्वये उल्हासनगर महानगरपालिकेच्या रस्ते विकास प्रकल्पास संदर्भाधीन क्र.०२ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय मान्यता देण्यात आली होती. सदर प्रशासकिय मान्यतेच्या अधीन राहून महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियानाअंतर्गत मंजूर उल्हासनगर महानगरपालिकेच्या रस्ते विकास प्रकल्पासाठी प्रथम हप्त्याचा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियानाअंतर्गत मंजूर उल्हासनगर महानगरपालिकेच्या रस्ते विकास प्रकल्पास खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे राज्य शासनामार्फत अनुज्ञेय असलेल्या पहिल्या हप्त्याच्या रकमेचा खाली दर्शविल्यानुसार निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रूपये कोटीत)

| अ. क्र | स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव व वर्गवारी | योजनेचे स्वरूप | एकूण मंजूर प्रकल्प किंमत (१०० टक्के) | संदर्भ क्र १ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनामार्फत अनुज्ञेय हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या (७० टक्के) | संदर्भ क्र १ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनामार्फत अनुज्ञेय हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या ३० टक्के) | संदर्भ क्र १ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनामार्फत अनुज्ञेय हप्ता | संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदानापैकी सध्या वितरीत करावयाचे अनुदान | राज्य शासनाने सध्या वितरीत करावयाचा हप्त्याचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | | ९. | १०. |
| १ | उल्हासनगर मनपा ड वर्ग | रस्ते विकास प्रकल्प | १७.०२४३ | ११.९१७० | ५.१०७३ | ५.९५८५ | ५.९५८५ | पहिला |

२. उपरोक्त नमूद केल्यानुसार निधीचे वितरण करण्यासाठी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी व सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी सदर अनुदान रूपये पाच कोटी पंच्याण्णव लक्ष, पंच्याऐंशी हजार (रूपये ५,९५,८५,०००) इतक्या रकमेचा धनादेश आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका यांच्या नावे काढून तो (Commissioner, Ulhasnagar Municipal Corporation ) या नावे काढून तो आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका यांच्याकडे सुपूर्द करावा व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

३. उपरोक्त अनुदानाचा वापर करण्याच्या दृष्टीने खालील अटींचे पालन करणे उल्हासनगर महानगरपालिकेस बंधनकारक राहील.

(अ) सदर निधीचा वापर वर नमूद प्रकल्पा करीताच करणे आवश्यक राहील. सदर निधीचा विनियोग प्रकल्पाव्यतिरिक्त इतर बाबींवर केल्यास सदरहू खर्च ही आर्थिक अनियमितता मानली जाईल.

(ब) सदर प्रकल्पाकरिता मंजूर किंमतीपेक्षा निविदा स्वीकृतीची किंमत अधिक असल्यास त्याचे दायित्व उल्हासनगर महानगरपालिकेचे राहील.

(क) प्रकल्प किंमतीपैकी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा स्वहिस्सा उभारण्याकरीता संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने विहीत वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतले असल्यास त्या कर्जाच्या रकमेची परतफेड नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने प्रामुख्याने वित्त आयोगातील प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्याचे नियोजन करावे. सदर स्त्रोतातून संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस प्राप्त होणाऱ्या रकमा, प्रकल्पांतर्गत घेतलेल्या कर्जापोटी शासनाने परस्पर वळती करून संबंधीत वित्तीय संस्थेस कर्जाच्या परतफेडीपोटी वर्ग करण्यास संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची संमती असल्याचा ठराव नगरपरिषदेने करून त्याची प्रत राज्यस्तरीय नोडल यंत्रणेमार्फत शासनास सादर करावी.

(ड) राज्य शासनाकडून प्राप्त होणाऱ्या अनुदानाच्या प्रमाणात निधी उभा करून प्रकल्प कार्यावर खर्च करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेवर बंधनकारक राहिल. अशा प्रकारे खर्च करून नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यानंतर शासनामार्फत पुढील हप्त्याचा निधी वितरीत करण्याबाबत उचित कार्यवाही केली जाईल.

४. या योजनेअंतर्गत प्रकल्पाच्या अंमलबजावणी तसेच सुधारणा क्षेत्रातील प्रगतीचा अहवाल नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने वेळोवेळी राज्यस्तरीय नोडल यंत्रणेमार्फत राज्य शासनास सादर करावा.

५. सदर शासन निर्णयान्वये प्राप्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र उपलब्ध करून संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी या नात्याने आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांची राहिल.

६. सदर प्रयोजनात होणा-या रुपये पाच कोटी, पंच्याण्णव लक्ष, पंच्याऐंशी हजार (रूपये ५,९५,८५,०००) इतक्या रक्कमेचा खर्च हा “नगर विकास विभाग- मागणी क्रमांक एफ-२, २२१७, नगर विकास, १९१ महानगरपालिकांना सहाय्य, (००) (५७) महाराष्ट्र नगरोत्थान महाभियानांतर्गत नगरपरिषदांसाठी सहाय्यक अनुदान (२२१७ ८०२१) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)” या लेखा शिर्षाखालील सन २०१४-१५ या वर्षीच्या मंजूर आर्थिक तरतुदीमधून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ७१६/व्यय-३, दिनांक २७/११/२०१४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२७१५१५२०५२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayasingrao Nanasaheb Patil

Digitally signed by Jayasingrao Nanasaheb Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao Nanasaheb Patil
Date: 2015.01.27 15:24:39 +05'30'

**(ज.ना.पाटील)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.

३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

७. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पू), मुंबई.

८. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, तथा नोडल एजन्सी.

९. सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई

१०.उप सचिव (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. जिल्हाधिकारी, ठाणे.

१२. सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई

१३.आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका

१४. निवडनस्ती, नवि-३३.